


# ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

## भाषा संचालनालयाची इतर प्रकाशने

१. पदनाम कोश
२. वित्तीय शब्दावली
३. शासन व्यवहार कोश
४. गणितशास्त्र परिभाषा कोश
५. समाजशास्त्र परिभाषा कोश
६. तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश
७. वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश
८. रसायनशास्त्र परिभाषा कोश
९. भूशास्त्र परिभाषा कोश
१०. शारीर परिभाषा कोश
११. शिक्षणशास्त्र परिभाषा कोश
१२. यंत्र अभियांत्रिकी परिभाषा कोश
१३. स्थापत्य अभियांत्रिकी परिभाषा कोश
१४. भौतिकशास्त्र परिभाषा कोश
१५. विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश
१६. कृषिशास्त्र परिभाषा कोश
१७. जीवशास्त्र परिभाषा कोश
१८. शरीरक्रियाशास्त्र परिभाषा कोश
१९. राज्यशास्त्र परिभाषा कोश
२०. साहित्य समीक्षा परिभाषा कोश
२१. लोकप्रशासन परिभाषा कोश
२२. अर्थशास्त्र परिभाषा कोश
२३. धातुशास्त्र परिभाषा कोश
२४. मानसशास्त्र परिभाषा कोश
२५. मराठी लघुलेखन
२६. मराठी लघुलेखन मार्गदर्शिका
२७. मराठी टंकलेखन प्रवेशिका
२८. शासन व्यवहारात मराठी
२९. प्रशासन वाक्प्रयोग
३०. प्रशासनिक लेखन
३१. राजभाषा परिचय
३२. राजभाषा परिचय कार्यरूप व्याकरण
३३. कार्यदर्शिका
३४. शुद्धलेखन नियमावली
३५. मंथन
३६. भारताचे संविधान

## ग्रंथालयशास्त्र उपसमिती

**अध्यक्ष**

श्री. म. सी. चहांदे, संचालक, ग्रंथालय संचालनालय

**प्रतिनिधि-सदस्य**

श्री. अ. चिं. टिकेकर, मुंबई विद्यापीठ

डॉ. म. प. पेठे, पुणे विद्यापीठ

श्री. म. रा. रिसवडकर, पुणे विद्यापीठ

डॉ. शां. ग. महाजन, पुणे विद्यापीठ

डॉ. व. वि. कुळकर्णी, नागपूर विद्यापीठ

श्री. उदाजीराव चव्हाण, शिवाजी विद्यापीठ

श्री. शा. शं. रेगे, मराठी विज्ञान परिषद

श्री. र. गो. जोगदेव, मराठवाडा विद्यापीठ

**सदस्य-सचिव**

डॉ. न. ब. पाटील, भाषा संचालक

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

महाराष्ट्रातील विद्यापीठांमध्ये शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. हे उच्च शिक्षण मराठीतून घेता यावे म्हणून विद्यापीठात शिकवली जाणारी क्रमिक पुस्तके व अन्य संदर्भ ग्रंथ मराठीत असणे नितांत आवश्यक आहे. संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे हे काम महाराष्ट्र राज्य पाठ्य पुस्तक निर्मिति मंडळाने व महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिति मंडळाने हाती घेतले असून महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठांतील नामवंत प्राध्यापक मंडळी विविध विषयांवर सध्या ग्रंथ लिहीत आहेत.

शास्त्रीय विषयांवरील या ग्रंथांसाठी एकरूप परिभाषा असावी आणि ही परिभाषा केंद्र सरकारने अखिल भारतीय स्तरावर विकसित केलेल्या विज्ञान शब्दावलीशी—मराठी भाषेच्या प्रकृतीशी व प्रवृत्तीशी विरोध न येईल अशी दक्षता बाळगून-मिळतीजुळती असावी असे धोरणही महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांनी मान्य केले आहे. ही एकरूप शास्त्रीय मराठी परिभाषा विकसित करण्याचे काम महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने भाषा संचालनालय करील असे शासनाने व आंतर्विद्यापीठ मंडळाने ऑक्टोबर १९६७ मध्ये ठरवले होते. त्या अनुसार भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील वेगवेगळ्या विषयांच्या परिभाषाविषयक उपसमित्या स्थापन केल्या व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या या कामास सुरुवात केली. आतापर्यंत रसायन, भौतिक, गणित, वाणिज्य, समाज, भूशास्त्र, शारीर या शास्त्रांची परिभाषा निश्चित करण्यात आली असून लवकरच ही परिभाषा पुस्तकरूपाने प्रकाशित होईल.

विद्यापीठांच्या अभ्यासक्रमातील ग्रंथांच्या निर्मितीसाठी शास्त्रीय परिभाषा अगोदर निश्चित होणे आवश्यक होते. तरीही अशी परिभाषा निर्माण होईपर्यंत, पाठ्यपुस्तकांची वा संदर्भ ग्रंथांची निर्मिती रोखून ठेवणे हितावह ठरले नसते. भाषा संचालनालयाकडेही मनुष्यबळ व द्रव्यबळ मर्यादितच असल्यामुळे एका विशिष्ट अग्रक्रमानुसार परिभाषा निर्मितीचे हे काम हाती घ्यावे लागले भाषा संचालनालयाची ही अडचण जाणून महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिति मंडळाच्या विशिष्ट विषयांच्या उपसमित्यांनी, ग्रंथलेखकांना लिखाणाच्या ओघात येणाऱ्या तांत्रिक व शास्त्रीय शब्दांचे व त्याबद्दल त्यांनी वापरलेल्या मराठी पर्यायांचे संकलन करावयास सांगितले. अशा

उपक्रमातूनच प्रस्तुत ग्रंथालयशास्त्र परिभाषा निर्माण झाली आहे. या परिभाषेचा कच्चा आराखडा श्री. अ. चिं. टिकेकर, उप-ग्रंथपाल, मुंबई विद्यापीठ, मुंबई, यांनी तयार केला होता श्री. व. वि. कुळकर्णी, ग्रंथपाल, नागपूर विद्यापीठ ग्रंथालय, नागपूर; श्री. कृ. शं. हिंगवे ग्रंथपाल, जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ, पुणे; श्री. त्र्यं. दि. वाकनीस; श्री शा. शं. रेगे, मुंबई श्री. रा. के. लेले, मुंबई, यांचेही ही परिभाषा परिष्कृत करण्याच्या कामी बरेच सहाय्य झाले. ग्रंथालयशास्त्रातील या सर्व अधिकारी व्यक्तींचे त्यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल भाषा संचालनालयाच्या वतीने मी आभार मानतो.

परिभाषेचा हा मसुदा महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिति मंडळाने भाषा संचालनालयाकडे मान्यतेसाठी पाठवला. या परिभाषेचे शास्त्रीयदृष्टया परीक्षण करून भाषा संचालनालयाने ती महाराष्ट्र राज्याच्या भाषा सल्लागार मंडळापुढे ठेवली. भाषा सल्लागार मंडळाने आपल्या बैठकींच्या नऊ सत्रांमध्ये या परिभाषेवर सांगोपांग विचार करून दिनांक २६-१२-१९७३ रोजी तिला अंतिमरीत्या मान्यता दिली आहे.

भाषा सल्लागार मंडळाच्या बैठकींमध्ये श्री. त्र्यं. दि. वाकनीस, श्री. कृ. शं. हिंगवे, श्री. कृ. द. पुराणिक, ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई; श्री. कृ. मु. उजळंबकर, ग्रंथालय उपसंचालक यांनीही खास निमंत्रणावरून येऊन परिभाषा निश्चितीच्या या कामामध्ये हार्दिक सहकार्य दिले त्याबद्दल भाषा सल्लागार मंडळाच्या व भाषा संचालनालयाच्या वतीने मी त्यांचे आभार मानतो.

श्री. वामनराव चोरघडे, संचालक, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिति मंडळ, नागपूर, यांनी या कामाचा पाठपुरावा केला नसता तर हे काम इतक्या लवकर होते ना. त्यांचाही मी आभारी आहे.

शास्त्रीय परिभाषा ही सतत विकसित होत असते. या परिभाषेचा जाणत्यांनी आपुलकीने विचार व वापर करावा व ती सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास त्या, भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्या म्हणजे पुढील आवृत्तीच्या वेळी त्या विचारात घेण्यात येतील.

**वा. म. कुलकर्णी,**

भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य.

# सुधारित आवृत्तीची प्रस्तावना

ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोशाची पहिली आवृत्ती १९७४ मध्ये प्रकाशित झाली. कालांतराने पुनर्मुद्रणाच्या निमित्ताने या पहिल्या आवृत्तीचा आढावा घेतल्यानंतर या आवृत्तीमध्ये काही नवीन पारिभाषिक संज्ञांची भर व आवश्यक तेथे पर्यायांमध्ये फेरबदल करण्याची गरज असल्याचे आढळून आले. गेल्या १०–१५ वर्षात ग्रंथालयशास्त्राचा बराच विस्तार झाला आहे. आता ग्रंथालयशास्त्र या विषयात एम. ए., पी. एच. डी. करणाऱ्या विद्यार्थांची भर पडत आहे. त्यामुळे या शास्त्राचा आवाका वाढला असून त्यामध्ये आता वर्गीकरण, तालिकीकरण, संदर्भसेवा, ग्रंथनिवड या नेहमीच्या पोटविषयांखेरीज, प्रलेखन, माहिती विज्ञान पद्धती, अधिनियम, व्यवस्थापन, शुष्कछाया मुद्रण, संघटन, इत्यादी विषयांचा समावेश करण्यात आला आहे. दुसऱ्या आवृत्तीच्या रूपाने परिपूर्ण असा ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश प्रकाशित करण्यासाठी ४ ऑक्टोबर १९८२ रोजी ग्रंथालयशास्त्र उपसमितीची स्थापना करण्यात आली. या समितीची पहिली बैठक १७ जानेवारी १९८३ रोजी झाली. उपसमितीचे अध्यक्ष म्हणून श्री. म. सी. चहांदे, ग्रंथालय संचालक यांची निवड सर्वानुमते करण्यात आली. मार्च १९८५ पर्यंत या उपसमितीच्या बैठकी चालू होत्या. पहिल्या आवृत्तीमधील त्रुटी कमी करून ही आवृत्ती परिपूर्ण करण्याचा प्रयत्न करण्यात आला. शेवटी या कोशाच्या कच्च्या झेरॉक्स प्रती काढून त्या उपसमितीच्या सर्व सदस्यांकडे अभिप्रायार्थ पाठविण्यात आल्या होत्या. एकरूपतेच्या दृष्टीने पुनर्विलोकन करण्यासाठी एक बैठक दिनांक २५ फेब्रुवारी १९८६ रोजी टाऊन हॉल, सेंट्रल लायब्ररी येथे घेण्यात आली होती.

ग्रंथालयशास्त्राची परिभाषा निश्चित करण्याच्या दृष्टीने प्रस्तुत उपसमितीने बरेच परिश्रम घेतले. या कोशाची मुद्रिते तपासताना काही त्रुटी आढळल्या. त्यांचे निराकरण करण्याच्या कामी अध्यक्ष श्री. म. सी. चहांदे यांनी आस्थेने सहकार्य केले. तसेच अन्य सदस्यांनी देखील खूप रस घेऊन हे काम शक्य तितक्या लवकर पूर्ण केले याबाबत या सर्वांचा मी अतिशय आभारी आहे.

या उपसमितीच्या सदस्यांची नावे स्वतंत्रपणे देण्यात आलेली आहेत. या उपसमितीचे अध्यक्ष आणि सदस्य यांनी परिभाषा निर्मितीसाठी घेतलेल्या परिश्रमाबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

उपसमितीच्या बैठकींना अभ्यागत म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचे विषयतज्ज्ञ व संस्कृततज्ज्ञ उपस्थित राहिले. त्यांचे या परिभाषा निश्चितीच्या कामी बहुमोल सहकार्य लाभले आहे. या सर्वांचा तसेच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलसचिव यांनी वेळोवेळी केलेल्या सहकार्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक, व विद्यार्थी यांना, तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिक, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीरक्रियाशास्त्र, जीवशास्त्र, राज्यशास्त्र, वाणिज्य शास्त्र (सुधारित), अर्थशास्त्र, साहित्य समीक्षा, लोकप्रशासन, धातुशास्त्र, व मानसशास्त्र या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच, भूगोल, भाषाविज्ञान, संख्याशास्त्र, गणितशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, विकृतिशास्त्र, औषधशास्त्र, न्यायवैद्यक व विषयशास्त्र या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण होण्याच्या मार्गावर असून ते कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश (सुधारित) हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

शास्त्रीय परिभाषा ही सतत विकसित होत असते. या कोशातील परिभाषेचा जाणकारांनी आपुलकीने व अभ्यासू वृत्तीने विचार करावा व या परिभाषेचा वापर करताना त्यांच्या नजरेस येणाऱ्या उणिवा भाषा संचालनालयाच्या निदर्शनास आणून द्याव्यात तसेच त्या सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास त्या, भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्यात अशी विनंती आहे.


प. ग. पाटील,
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

भाषा संचालनालय,
मुंबई ४०० ०३२

दिनांक

# निवेदन

भाषा हे विचारांच्या वहनाचे व ग्रहणाचे प्रभावी माध्यम असते तसेच परकीय भाषेपेक्षा मातृभाषेत आपले विचार अधिक प्रभावीपणे आणि सुलभतेने व्यक्त केले जाऊ शकतात, हे सत्य ओळखून महाराष्ट्र शासनाने मराठीला राजभाषेचा दर्जा दिला आणि केवळ प्राथमिकच नव्हे तर उच्च शिक्षणदेखील मराठी माध्यमातून देणे-घेणे सुलभ करण्याची महत्त्वाची जबाबदारी भाषा संचालनालयाकडे सोपविली.

स्वातंत्र्योत्तर काळात प्राथमिक शिक्षण सक्तीचे झाल्यामुळे आणि शिक्षणाच्या सार्वत्रीकरणामुळे महाराष्ट्रातील साक्षरतेच्या प्रमाणाबरोबरच ग्रंथालयांची संख्याही वाढतच आहे.

स्वतंत्र्य भारताच्या पहिल्या दोन दशकात विविध विद्याशाखांतील उच्च शिक्षणात इंग्रजी माध्यमाचीच मिरासदारी दिसून येत होती. ग्रंथालयशास्त्रदेखील याला अपवाद नव्हते. आता मात्र महाराष्ट्रातील बहुतेक विद्यापीठातून अनेक शास्त्रांचे उच्च शिक्षण मराठी माध्यमातून देण्या-घेण्याची सोय उपलब्ध झाली आहे किंवा होत आहे.

ग्रंथ, ग्रंथालये, ग्रंथालयशास्त्र आणि ग्रंथालय चळवळ यांच्याशी संबंधित मराठी भाषिक वाचकांना, अभ्यासकांना आणि अध्यापकांना उपयुक्त व्हावे म्हणून ग्रंथालयशास्त्र परिभाषाकोशांची पहिली आवृत्ती यापूर्वीच भाषा संचालनालयाने प्रकाशित केली होती.

पहिल्या आवृत्तीतील त्रुटी कमी करण्यासाठी आणि सदर आवृत्ती अधिक विस्तृत आणि समावेशक करण्यासाठी उपसमितीच्या सर्वच सदस्यांनी आणि भाषा संचालनालयाच्या संबंधित अधिकाऱ्यांनी आणि कर्मचाऱ्यांनी जे मौलिक सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

मातृभाषेचा सार्थ स्वाभिमान जोपासणाऱ्या मराठी भाषिक अभ्यासकांच्या बहुतेक अपेक्षा या आवृत्तीमुळे पूर्ण होतील, अशी आशा आहे.

**म. सी. चहांदे,**
अध्यक्ष,
ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश
उपसमिती.

**मुंबई;**
**दिनाक ४-४-१९९४.**

# कोश परिचय

कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—

इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून "Glossary of Library Science Technical Terms"—P. N. Gour ; "Librarain's Glossary"—L. M. Harrod यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (Speling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

इंग्रजी शब्दजाती :—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे (जसे :— *n*; *adj*.;*v.t.*;*v.i* इ.). इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

विषयनिर्देशक संक्षेप :—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरांत दिला आहे.

पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिलेले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात "as in." असे देऊन त्या पर्यायांचा वाक्यात उपयोग करून दाखविला आहे.

मराठी शब्दजाती :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

लिंगनिर्देश :— (१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे. (३) इंग्रजी अनेकवचनी जोडशब्दांच्या मराठी पर्यायापुढेही लिंगनिर्देश केला आहे.

शब्दकुळे :— शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते परंतु त्यातील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf*. असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे *cf*. असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ ३१ वरील ("Hand Book") हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा :**—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृष्ठ १२ वरील "Catalogue" ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**समानार्थी शब्द :**—काही इंग्रजी शब्द समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (also) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर (=) अशी खूण दर्शवून, पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे (उदा. पृष्ठ १ वरील absolute location) ही संज्ञा, व पृष्ठ २७ वरील (fixed location ही संज्ञा). त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling मध्ये) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शविण्यात आले आहेत.

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्र क्षेत्रात यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्यात समन्वय साधण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करताना देखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावलींचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकांतून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत, ते देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या प्रचलित इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणत: पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे, वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना नावापुढे त्यांची संकेतचिन्हे सुद्धा द्यावीत. जसे—हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र, मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसेच ठेवावे. जसे.—किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानिक $9th_{238}$.

निकोटीन $C_{10}H_{14}N_2$.

रासायनीक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून, पुढील प्रमाणे द्यावीत :—



सोडियम बायसल्फेट + सोडियम क्लोराईड = सोडियम सल्फेट + हायड्रोक्लोरिक आम्ल

$NaHSO_4 + NaCl = Na_2So_4 + HCL$

गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे, इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत ; परंतु संयुगांमध्ये मात्र त्यांचा वापर करू नये.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे. जसे.—कॅलरी, अॅम्पिअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरुन घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरुप लिहाव्यात. जसे.—फॅरनहाइट श्रेणी (फॅरनहाइट), व्होल्टामीटर (व्होल्टा), अॅम्पीअर अॅम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूविज्ञान, इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा (binomical nomenclature).

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रान, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे.

जसे.--साइन (sin), कोसाइन (cos), टॅन्जंट (tan), लाग (log) वगैरे.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा, महाविद्यालये, इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत. जसे.--ऑक्सिजन प्राणवायू, कॅलरी--उष्मांक, sin--ज्या, cos--कोज्या, वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्यायदेखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. जसे.--"cm" म्हणजे सेंटिमीटर या संज्ञेचा संक्षेप सें. मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षीत वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारण वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत, ते तसेच ठेवावेत. जसे.--मशीन, इंजिन, मोटर, लिटर वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपांत द्यावेत.

८. मिश्र शब्दांची निर्मिती.--वैज्ञानिक परिभाषा तयार करताना, 'pasteurisation'--पाश्चरीकरण'; 'voltage--व्होल्टता' अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन त्यांसाठी निश्चितार्थक पर्याय तयार करावेत.

# ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश

## A

abbreviated card, संक्षेपित पत्र
abbreviated catalogue card, संक्षेपित तालिका पत्र
abbreviated title card, संक्षेपित ग्रंथनाम पत्र
abbreviations, *n.pl.* संक्षेपाक्षरे (न.अ.व.)
abbreviator, *n.* संक्षेपक (सा.)
aberrant copy, सदोष मजकुरी प्रत
abnormal book, असाधारण ग्रंथ
abridged, *adj.* संक्षिप्त
abridged decimal classification, संक्षिप्त डेसिमल वर्गीकरण, संक्षिप्त दशांश वर्गीकरण
abridged edition, संक्षिप्त आवृत्ति
abridgment, *n.* (*also* abridgement) संक्षेप (पु.)
absolute location, (*also* fixed location) स्थिर स्थान
absolute size, (*also* called exact size) निर्दिष्ट आकार
absorbency, *n.* (*also* absorbancy) शोषण-क्षमता (स्त्री.)
absorbent paper, शोषणक्षम कागद
absorption, *n.* १ शोषण (न.) २ समावेशन (न.)
abstract, *n.* सार (न.)
abstracting, *n.* सारलेखन (न.)
abstracting periodical, (*also* called abstract journal *or* abstracts' bulletin) सार नियत-कालिक
abstracting service, सारलेखन सेवा
abstraction, *n.* अमूर्त वर्गीकरण (न.)
abstract journal, (*also* called abstracting periodical *or* abstracts' bulletin) सार कालिक
abstracts' bulletin, (*also* called abstracting periodical *or* abstract journal) सारपत्रिका (स्त्री.)
academic library, विद्यासंस्था ग्रंथालय
academic library system, विद्यासंस्था ग्रंथालय प्रणाली
academy publication, अकादमी प्रकाशन
access, *n.* १ प्रवेश (पु.), प्रवेशपद्धति (स्त्री.) २ पहाव्यास मिळणे (न.)
accessibility, *n.* अभिगम्यता (स्त्री.)
accessible, *adj.* अभिगम्य
accession, *n.* १ दाखलनोंद करणे (न.) २ अवाप्ति (स्त्री.)
accession assistant, दाखलनोंद सहायक
accessioning, *n.* दाखल नोंदणी (स्त्री.)
accession list, १ दाखलनोंद यादी २ अवाप्ति यादी
accession number, १ दाखल क्रमांक, दाखल अंक २ अवाप्ति क्रमांक
accession order, दाखलक्रमानुसारी मांडणी
accession register, दाखलनोंदवही (स्त्री.)
accession section, १ दाखलनोंद विभाग २ अवाप्ति विभाग
accession slip, दाखलनोंद चिठ्ठी
accession stamp, दाखलक्रमांक शिक्का
accident, *n.* (*w.r.t.* five predicables) अभावित गुण (पु.)
accompanying material, सहसाहित्य (न.)
accredited library school, (*also* called approved library school) अधिस्वीकृत ग्रंथालयशास्त्र शिक्षणसंस्था
acetate film, ॲसिटेट फिल्म (सहज पेट न घेणारी फिल्म)
acquisition, *n.* अर्जन (न.) (as in : acquisition of books ग्रंथार्जन)
ACRL, (*short for* Association of College and Research Libraries) एसीआरएल
acronym = initionym

acting edition, रंगावृत्ति (स्त्री.)
adaptation, *n.* रूपांतर (न.)
adapter, *n.* रूपांतरकार (सा.)
added entry, अधिक नोंद, पूरक नोंद
addenda, *n.pl.* भरपृष्ठे (न.अ.व.)
*ad interim* copyright, निर्णय अंतरिमकालीन प्रतिलिपि अधिकार
adjournment of meeting, सभास्थगन (न.)
adjustable, *adj.* समायोज्य, सोयीचा
adjustable classification, समायोज्य वर्गीकरण, सोयीचे वर्गीकरण
adjustable periodicals list, समायोज्य नियतकालिक सूची
adjustable shelf, सोयकप्पा (पु.) (सोयीनुसार वरखाली करता येणारा कप्पा)
administration, *n.* प्रशासन (न.)
administrative comments, प्रशासकीय अभिप्राय (पु.अ.व.)
admission card, प्रवेश पत्र
admission record, प्रवेश अभिलेख
admission slip, प्रवेश चिठ्ठी
ADS, (*short for* autograph document signed) (सही केलेला स्वलिखित प्रलेख) सस्वप्र
advance copy, (*also* called early sheets) अनिबद्ध प्रकाशन, अग्रथित प्रकाशन
advance sheets = early sheets
advertisement file, जाहिरात नमुनाफाईल
advisory function, सल्लाविषयक कार्य
agent, *n.* १ प्रतिनिधि (पु.) २ एजंट (पु.)
aggregate, *n.* समुच्चय (पु.)
aided library, प्राप्तानुदान ग्रंथालय
air dried paper, वायुशोषित कागद
aisle, *n.* (instack) पार्श्वपथिका (स्त्री.) (ग्रंथसंग्रहदालनाभोवतीचा मार्ग)
ajoure binding, आजूर बांधणी
ALA, (*short for* American Library Association) एएलए
albumin process, १ श्विति प्रक्रिया २ अल्ब्युमिन प्रक्रिया
alcove, *n.* (*also* called carrel *or* research cubicle) कोष्ठिका (स्त्री.)
Aldine (Italian) style, अल्डाईन (इटालियन) शैली
alkali process, अल्क प्रक्रिया
all along binding, एकधागी बांधणी
all along sewing, फर्म्यांची एकसूत्री शिवण
allocation, *n.* १ विल्हेवारी (स्त्री.) २ वाटप (न.)
allocation of grant, अनुदान वाटप
allonym, *n.* (*also nom-de-plume*; penname *or* pseudonym) (*opp.* autonym) टोपणनाव (न.)
allotment, *n.* नियतवाटप (न.)
allotment of grant, अनुदान नियतवाटप
all over binding, सर्वांगीण बांधणी
all over style, सर्वालंकरण शैली
all rights reserved, सर्वाधिकार सुरक्षित
allusion book, नावावर खपवलेला ग्रंथ
almanac = ephemeris
alphabet, *n.* मूळाक्षर (न.)
alphabetic = alphabetical, *adj.* वर्णक्रमी-, वर्णानुक्रमी, वर्णानुसारी
alphabetical catalogue, (*also* called alphabetical device *or* dictionary catalogue) वर्णक्रमी तालिका
alphabetical device, (*also* called alphabetical catalogue) वर्णक्रमी क्लुप्ति
alphabetical index, वर्णक्रमी निर्देशसूची
alphabetical sequence, वर्णक्रमी क्रम
alphabetico-classed catalogue, वर्णक्रमी वर्गतालिका
alphabetic order table, वर्णक्रमी क्रम तक्ता
alphabetico-specific, *adj.* वर्णक्रमी विनिर्दिष्ट
alphabetic subject catalogue, वर्णक्रमी विषयतालिका

**alphabetic subject filing system,** वर्णक्रमी विषयक्रमरचना पद्धति

**alphabetic subject index,** वर्णक्रमी विषय-निर्देशसूची

**alphabetisation,** *n.* वर्णक्रमी रचना (स्त्री.)

**alphabetising = alphabeting,** *n.* वर्णानुक्रम लावणे (न.), वर्णक्रमी रचना (स्त्री.), वर्णक्रमानुसार रचना करणे (न.)

**ALS,** (*short for* **autograph letter signed**) सस्वप (सही केलेले स्वलिखित पत्र)

**alternative location (in classification),** (वर्गीकरणातील) पर्यायी स्थान

**alternative title,** पर्यायी ग्रंथनाम

**amalgamation,** *n.* एकत्रीकरण (न.)

**ambiguous title,** संदिग्ध ग्रंथनाम

**American Library Association,** (*abbr.* **ALA**) अमेरिकन लायब्ररी असोसिएशन

**'Ampere' classification,** 'अँपिअर' वर्गीकरण

**ampersand,***n.* अँपरसँड (न.) ('and' या शब्दाचे संक्षिप्तचिन्ह '&')

**–an,** *suff.* –संबंधी (as in : Gandhian literature गांधींसंबंधी साहित्य; Indian literature भारतासंबंधी साहित्य)

**anagram,** *n.* वर्णविपर्यस्त शब्द (पु.)

**analogue computer,** अनुरूप संगणक

**analyse,** *v.t.* विश्लेषण करणे

**analysis,** *n.* विश्लेषण (न.)

**analytical bibliography,** (*also* **pure bibliography**) (*also* called **critical bibliography**) विश्लेषणात्मक ग्रंथसूची

**analytical cataloguing,** विश्लेषणात्मक तालिकीकरण

**analytical entry,** विश्लेषणात्मक नोंद

**analytical method,** विश्लेषणात्मक पद्धति

**analytical note,** विश्लेषणात्मक टीप

**analytical table of contents,** विश्लेषणात्मक अनुक्रमणिका

**analytico-synthetic,** *adj.* विश्लेषण-संश्लेषण–, विश्लेषण-संश्लेषणात्मक

**anastatic,** *adj.* चित्रांतरण–

**anastatic process,** चित्रांतरण प्रक्रिया

**anastatic reprint,** चित्रांतरण पुनर्मुद्रण

**ancillary,** *adj.* सहाय्यभूत

**angle bracket,** चौकोनी कंस (पु.)

**angle-top,** *n.* (*also* **angle tab-guide**) पृष्ठ बाह्य टॅब (पु.)

**Anglo-American Code, 1908,** अँग्लो-अमेरिकन तालिका संहिता, १९०८ ; ए.ए. कोड, १९०८

**animal sizing,** चरबी लेपन

**annalistic arrangement,** कालक्रमी रचना

**annals,** *n.pl.* कालक्रमी वृत्तांत (पु. अ. व.), वर्षवृत्तांत (पु. अ. व.)

**anniversary issue,** १ जयंती अंक २ (in case of institute) वर्धापन अंक

**annotated,** *adj.* सटीप

**annotated documentation list,** विवरणटिपांसह प्रलेखन यादी, सटीप प्रलेखन यादी

**annotation,** *n.* विवरण टीप (स्त्री.)

**annual,** *n.* वार्षिक (न.)

*cf.* biannual अर्धवार्षिक
biennial द्विवार्षिक
fortnightly पाक्षिक
half yearly षण्मासिक
journal कालिक
magazine कालिकपत्रिका
monthly मासिक
periodical नियतकालिक
quarterly त्रैमासिक
serial क्रमकालिक
weekly साप्ताहिक

**anonym,** *n.* (one that retains anonymity or is of unknown name) अनाम (न.), निनावी (न.)

**anonymous,** *adj.* अनामिक

**anonymous author,** अनामिक लेखक

**anonymous classic,** अनामिक अभिजात ग्रंथ

**anonymous work,** अनामिक कर्त्याची कृति
**anterior division,** पूर्ववर्ती विभाग
**anteriorisation,** *n.* पूर्ववर्तीकरण (न.)
**anteriorise,** *v.t.* पूर्ववर्ती करणे
**anterioriser,** *n.* पूर्ववर्तीकार (पु.)
**anteriorising,** *adj.* पूर्ववर्तनी
**anteriorising common isolates,** पूर्ववर्तनी सामान्य विविक्तके (न.अ.व.)
**anthology,** *n.* (a collection from the writings of one or more authors having a common characteristic usually limited to poetry or to a particular subject) वेचक साहित्य संग्रह (पु.)
**anticipatory documentation list,** अपेक्षित प्रलेखन यादी
**antique paper,** अँटिक कागद, अँटिक पेपर
**antique tooling,** अँटिक अलंकरण
**antonym,** *n.* विरुद्धार्थी शब्द (पु.)
**antonymous catchword,** विरुद्धार्थी सूचक शब्द
**apocryphal book,** शंकास्पद ग्रंथ
**apograph,** *n.* मूळ हस्तलिखित प्रत (स्त्री.)
**apparatus,** *n.* उपकरण संच (पु.)
**appendix,** *n.* परिशिष्ट (न.)
**application card,** आवेदन पत्र
**application file,** (*also* borrower file) ग्रंथ-ऋणग्राही फाईल
**application form,** आवेदन पत्राचा नमुना
**applied bibliography**=historical bibliography
**appraisal,** *n.* मूल्यन (न.)
**apprentice,** *n.* शिकाऊ उमेदवार (पु.)
**approach,** *n.* १ पोच (स्त्री.) २ प्रवेशमार्ग (पु.) ३ दृष्टिकोन (पु.)
**approach material,** उपसाधन (न.)
**approved library school,** (*also* called accredited library school) मान्यताप्राप्त ग्रंथालयशास्त्र शिक्षणसंस्था
**Arabic figures,** अरेबिक आकडे (पु.अ.व.)
**Arabic numerals,** अरेबिक अंक (पु.अ.व.)
**archetypal novel,** जुन्या वळणाची कादंबरी
**architect,** *n.* वास्तुशास्त्रज्ञ (सा.)
**archives,** *n.pl.* १ पुराभिलेख (पु.) २ अभिलेखागार (न.)
**archivist,** *n.* पुराभिलेखपाल (सा.), पुराभिलेखतज्ञ (सा.)
**area number**=geographical number
**armorial book-plate,** आयुधांकित ग्रंथालयमुद्रा
**arrange,** *v.t.* व्यवस्थित लावणे
**arrangement,** *n.* १ व्यवस्था (स्त्री.) २ क्रम (पु.) ३ रचना (स्त्री.)
**arrangement of sections,** उपविभाग व्यवस्था
**array,** *n.* १ विन्यास (पु.) २ पंक्ति (स्त्री.)
**array of classes,** वर्ग विन्यास
**arrester,** *n.* समाप्ति चिन्ह (न.)
**arrow,** *n.* बाण (पु.)
**arrow backward,** (*also* backward arrow) उलटा बाण ('कोलन' वर्गीकरणातील संकेत चिन्ह, जसे ← १९००)
**arrow forward,** (*also* forward arrow) सुलटा बाण ('कोलन' वर्गीकरणातील संकेत चिन्ह, जसे १९०० →)
**art craft,** कृत्रिम कातडी बांधणी (बांधणीचा एक प्रकार), आर्ट क्राफ्ट
**art file**=picture file
**article,** *n.* लेख (पु.)
**artificial characteristic,** कृत्रिम लक्षण
**artificial classification,** कृत्रिम वर्गीकरण
**artificial composite book,** कृत्रिम संमिश्र ग्रंथ
**artificial language of ordinal numbers,** क्रमवाचक अंकांची कृत्रिम भाषा
**art paper,** आर्ट पेपर, चित्र कागद
**art vellum,** आर्ट वेलम
**ascender,** *n.* आरोहक (पु.) (मुद्राक्षराचा एक भाग)
**ascender type,** *Print.* आरोही मुद्र
**aslib,** (*short for* Association of Special Libraries and Information Bureaux which

was later merged with Association for Information management) ॲस्लिब
assemblage, *n.* जुळवणी (स्त्री.)
assemblage of loose subjects, विविध विषय समुच्चय
assembling, *n. Binding* फर्मा जुळवणी (स्त्री.)
assigned notification blank, नियोजित पाठार्थ ग्रंथसूची
assigned reading room, रक्षित ग्रंथवाचन कक्ष
assistant, *n.* सहायक (सा.)
associate, *n.* सहयोगी (सा.)
associated, *adj.* १ सहयोगी २ संबंधित
associated book, १ सहयोगी ग्रंथ २ सहयोगी पुस्तक
associated book note, सहयोगी ग्रंथ टीप
associate editor, सहयोगी संपादक
associate librarian, सहयोगी ग्रंथपाल
association, *n.* संघ (पु.)
association book, स्मृतिनिगडित ग्रंथ
Association of College and Research Libraries, (*abbr.* ACRL) असोसिएशन ऑफ कॉलेज ॲन्ड रिसर्च लायब्ररीज
association publication, (*also* society publication) संस्था प्रकाशन
asterisk, *n.* (*) ताराचिन्ह (न.) (तळटीप चिन्ह)
astronomical map, खगोलीय नकाशा
asyndetic catalogue, (a catalogue without cross-references) प्रतिसंदर्भविरहित तालिका
Athenaeum, *n.* ॲथेनिअम (न.) (ग्रीसमधील अथेन्स येथील प्रार्थनास्थळातील ग्रंथालय)
atlas, *n.* नकाशापुस्तक (न.), ॲटलास (पु.)
atlas folio=elephant folio
attendant, *n.* ग्रंथपरिचर (सा.)
attributed author, (*also* presumed author *or* supposed author) संदिग्ध ग्रंथकार
auction catalogue, लिलाव सूची
audio-visual, *adj.* दृक्श्रुति –, दृक्श्राव्य
audio-visual aids, दृक्श्रुति साधने (न.अ.व.)
audio-visual library, दृक्श्रुतिसाधन ग्रंथालय
audio-visual materials, दृक्श्रुति साहित्य
audit, *n.* लेखापरीक्षा (स्त्री.)
auditorium, *n.* श्रोतृगृह (न.)
author, *n.* (*also* writer) १ लेखक (पु.), लेखिका (स्त्री.) २ ग्रंथकार (पु.), –कर्ता (पु.) ३ लेखनिक (पु.), लेखकू (पु.)
author affiliation, ग्रंथकार संबंधन
author analytic entry, ग्रंथकार विश्लेषणात्मक नोंद
author authority card, १ प्राधिकृत ग्रंथकार-नामपत्र २ स्वीकृत ग्रंथकार नामपत्र
author bibliography, लेखक ग्रंथसूची
author card, ग्रंथकार पत्र
author catalogue, ग्रंथकार तालिका
author entry, ग्रंथकार नोंद
author fullness, ग्रंथकार पूर्णोल्लेख
author heading, १ लेखक शीर्षक २ ग्रंथकार शीर्षक
author indention, (*also* first indention *or* first vertical) (नोंदपत्रावरील) प्रथम समासांतर
author index entry, ग्रंथकार निर्देश नोंद
authorised edition, अधिकृत आवृत्ति
authority, *n.* १ प्राधिकारी (सा.) २ प्राधिकरण (न.) ३ प्राधिकार (पु.) ४ प्राधिकार-पत्र (न.)
authority card=information card
authority entry, प्रमाण नोंद
authority file, प्रमाण फाईल
authority list, प्रमाण यादी
author mark, ग्रंथकार चिन्ह
author number, ग्रंथकारांक (पु.)
author-publisher, *n.* लेखक-प्रकाशक (पु.)
author's binding, खास बांधणी
author's correction, (*also* author's proofs *or* author's revise) अंतिम मुद्रिते (न.अ.व.)
author style, १ लेखक शीर्ष २ लेखन शैली

author table, (*also* Cutter's table) ग्रंथकार नाम संक्षेप तक्ता
auto–, *pfx.* (*also* automatic) स्वयं–
auto-abstract, *n.* संगणकी सार (न.)
auto-bias device, (*also* called super-imposition device) स्वयंकल क्लृप्ति (स्त्री.)
autobiography, *n.* आत्मचरित्र (न.)
autograph, *n.* १ (ग्रंथकाराची) स्वहस्ताक्षरी (स्त्री.) २ स्वहस्तलिखित ग्रंथ (पु.)
autograph document signed, (*abbr.* ADS) सही केलेला स्वलिखित प्रलेख (सस्वप्र)
autographed copy, स्वाक्षरित प्रत
autographed edition, स्वाक्षरित आवृत्ति
autograph letter signed, (*abbr.* ALS) सही केलेले स्वलिखित पत्र (सस्वप)
autolithography, *n.* स्वयंशिलामुद्रण (न.)
automatic=auto–
automatic abstracting, संगणकी सारलेखन
automatic book carrier, स्वयंचलित ग्रंथवाहिका
automatic book charging, स्वयंचलित ग्रंथदेवाणनोंद
automatic book delivery, स्वयंचलित ग्रंथवितरण
automatic datamation=datamation
automatic feeder, स्वयं संभरक
automatic indexing, संगणकी निर्देशन
automatic routing, नियतक्रम प्रेषण
automatic selector, स्वयंचलित निवडयंत्र
automation, *n.* स्वयंचलन (न.)
autonym, *n.* (*opp.* allonym, pseudonym) मूळ नाव (न.)
auxiliaries, *n.pl.* सहाय्यके (न.अ.व.)
auxiliary division, सहाय्यकारी विभाग
auxiliary number, सहाय्यकारी क्रमांक
auxiliary publication, सहाय्यकारी प्रकाशन
auxiliary table, सहाय्यकारी तक्ता
auxiliary title, सहाय्यकारी ग्रंथनाम
azure laid paper, अझ्युअर लेड कागद, अझ्युअर लेड पेपर
azure tooling, समरेखीय अलंकरण

# B

**back,** *n.* (*also* **backbone** *or* **backstrip** *or* **spine**) कणा (पु.)
**back edge,** पार्श्वकड (स्त्री.)
**back file,** (issues of a periodical preceding the current number) मागील अंक
**back lining** = **cover lining**
**backstrip** = **back**
**back title,** (*also* **binder's title**) बांधणीवरील ग्रंथनाम
**backward arrow** = **arrow backward**
**Baconian classification,** बेकन वर्गीकरण
**band,** *n.* पट्टी (स्त्री.)
**banding,** *n. Binding* पट्टी अलंकरण (न.)
**banned,** *adj.* (*also* **proscribed**) १ बंदी घातलेला २ आक्षिप्त
**banned book,** १ बंदी घातलेला ग्रंथ २ आक्षिप्त ग्रंथ
**bar,** *n.* (|) दंड (पु.)
**bark,** *n.* साल (स्त्री.)
**base-line,** *n.* आधाररेषा (स्त्री.)
**base of notation,** चिन्हांकन पाया
**basic,** *adj.* १ आधारभूत २ अंगभूत ३ मूलभूत
**basic book,** आधारभूत ग्रंथ
**basic class** = **summum genus**
**basic facet,** अंगभूत पैलू
**basic reference service,** १ मूलभूत संदर्भ सेवा २ मूलभूत संदर्भ सहाय्य
**basic stock,** आधारभूत संग्रह
*basi fosi,* अंगभूत लक्ष्ये (न.अ.व.)
**bastard title** = **half-title**
**battered,** *adj.* झिजलेला
**bay,** *n.* अंतराल (न.), मधली जागा (स्त्री.)
**bay guide,** अंतराल फलक
**bead** = **beading,** *n.* ग्रंथ काढणी (स्त्री.), बिडिंग (न.)
**beater,** *n.* बडवणी (स्त्री.)
**belles-letters,** *n.* ललित साहित्य (न.)
**bench sewing,** बेंच शिवण
**Ben Day process,** बेन-डे-प्रक्रिया (स्त्री.)
**bespeaking book,** १ प्रकाशनपूर्व आरक्षित ग्रंथ २ प्रकाशनपूर्व आरक्षित पुस्तक ३ सतत मागणीतील ग्रंथ ४ सतत मागणीतील पुस्तक
**best book,** १ उत्तम ग्रंथ २ उत्तम पुस्तक
**best seller,** उत्तम खपाचे पुस्तक
**biannual,** *n.* अर्धवार्षिक (न.) *cf.* annual
**bias,** *n.* कल (पु.)
**bias device,** कल क्लृप्ति
**biasing phase,** अभिनत अवस्था
**bibelot,** *n.* (*also* **miniature book** *or* **vade-mecum**) छोटेखानी पुस्तक (न.), गुटका (पु.)
**bibliographer,** *n.* ग्रंथसूचीकार (पु.)
**bibliographical classification,** ग्रंथाश्रयी वर्गीकरण
**bibliographical classification system,** ग्रंथाश्रयी वर्गीकरण पद्धति
**bibliographical control,** (collecting, classifying and making readily accessible all kinds of recorded knowledge) ग्रंथ वृत्त नोंदणी
**bibliographical description,** ग्रंथसूचीविषयक वर्णन
**bibliographical function,** ग्रंथसूचीविषयक कार्य
**bibliographical ghost,** (a book recorded in a bibliography of whose existence there is no reasonable proof) सूचीमावस्थ ग्रंथ
**bibliographical note,** ग्रंथविषयक टीप
**bibliographical reference,** ग्रंथविषयक संदर्भ
**bibliographical services,** ग्रंथसूची सेवा
**bibliographical tools,** ग्रंथवृत्त साधने (न.अ.व.)
**bibliography,** *n.* १ अभ्यासवाङ्मय सूची (स्त्री.) २ वाङ्मय सूची (स्त्री.) ३ ग्रंथसूची (स्त्री.) ४ साहित्यसूची (स्त्री.)

analytical bibliography विश्लेषणात्मक ग्रंथसूची
author bibliography लेखक ग्रंथसूची
bibliophilic bibliography ग्रंथसंग्रहप्रेमी ग्रंथसूची
comprehensive bibliography सर्वसमावेशक ग्रंथसूची
critical bibliography सदोष ग्रंथसूची
descriptive bibliography, वर्णनात्मक ग्रंथसूची
document bibliography प्रलेख ग्रंथसूची
electic bibliography मतसंग्रही ग्रंथसूची
elective bibliography पसंती ग्रंथसूची
enumerative bibliography प्रगणन ग्रंथसूची
exhaustive bibliography परिपूर्ण ग्रंथसूची
international bibliography आंतरराष्ट्रीय ग्रंथसूची
linguistic bibliography भाषिक ग्रंथसूची
local bibliography स्थानिक ग्रंथसूची
national bibliography राष्ट्रीय ग्रंथसूची
partial bibliography आंशिक ग्रंथसूची
periodical bibliography नियतकालिक सूची
personal bibliography व्यक्तिनिष्ठ ग्रंथसूची
place bibliography स्थल ग्रंथसूची
primary bibliography प्रारंभिक ग्रंथसूची, मूळ ग्रंथसूची
pure bibliography=analytical bibliography
rarities bibliograph दुर्मिळ ग्रंथसूची
reference bibliography संदर्भ ग्रंथसूची
regional bibliography प्रादेशिक ग्रंथसूची
secondary bibliography दुय्यम ग्रंथसूची
select bibliography निवड ग्रंथसूची
selective bibliography निवडक ग्रंथसूची
subject bibliography विषय ग्रंथसूची
systematic bibliography शास्त्रसिद्ध ग्रंथसूची
tertiary bibliography तिय्यम ग्रंथसूची
textual bibliography पाठभेददर्शक ग्रंथसूची
topical bibliography पुरवणी ग्रंथसूची
trade bibliography ग्रंथव्यापारसूची
unit bibliography एकक ग्रंथसूची, घटक ग्रंथसूची
universal bibliography=world bibliography जागतिक ग्रंथसूची, आंतरराष्ट्रीय ग्रंथसूची

**bibliography of bibliographies,** ग्रंथसूच्यांची ग्रंथसूची
**bibliography of periodicals,** नियतकालिकांची ग्रंथसूची
**bibliography of serials,** क्रमकालिकांची सूची
**bibliomania,** *n.* ग्रंथछंद (पु.), ग्रंथवेड (न.)
**bibliophile,** *n.* ग्रंथसंग्रहप्रेमी (पु.)
**bibliophile edition,** ग्रंथसंग्रहप्रेमी आवृत्ति
**bibliophilic bibliography,** ग्रंथसंग्रहप्रेमी ग्रंथसूची
**bibliophobia,** *n.* ग्रंथभीति (स्त्री.)
**bibliopole,** *n.* दुर्लभग्रंथ विक्रेता (पु.), दुर्मिळग्रंथ विक्रेता (पु.)
**bibliotheca,** *n.* ग्रंथालय. (न.)
**bibliothec classification,** (*also* bibliothecal classification) ग्रांथिक वर्गीकरण
**biennial,** *n.* द्विवार्षिक (न.) *cf.* annual
**bifurcate classification,** (*also* called classification by dichotomy) द्विभागी वर्गीकरण
**bifurcation,** *n.* द्विभाजन (न.)
**bilingual dictionary,** द्वैभाषिक कोश
**bill,** *n.* १ देयक (न.) २ विधेयक (न.)
**bill drafting,** विधेयक प्रारूपण
**bimonthly,** *adj.* द्वैमासिक (दोन महिन्यांतून एकदा निघणारे)
**binder,** *n.* बांधणीकार (पु.)
**binder's board,** बांधणी फलक
**binder's seal,** (*also* binder's ticket) बांधणीकार मुद्रा
**binder's title**=back title
**bindery,** *n.* बांधणी विभाग (पु.)

binding, *n.* बांधणी (स्त्री.)
ajoure binding आजूर बांधणी
author's binding खास बांधणी
cloth binding कापडी बांधणी
coil binding सर्पिल बांधणी
deluxe binding शाही बांधणी
edition binding मूळ बांधणी
embroidered binding कशिदा बांधणी
extra binding विशेष बांधणी
flexible binding लवचिक बांधणी
full binding पूर्ण बांधणी
gift binding मानार्थ बांधणी
half-binding अर्ध-बांधणी
half-cloth binding अर्ध-कापडी बांधणी
half-leather binding अर्ध-कातडी बांधणी
leather binding कातडी बांधणी
needlework binding = embroidered binding
paper binding कागदी बांधणी
publisher's binding = edition binding
reinforced binding प्रबलित बांधणी
rexin binding रेक्झिन बांधणी
spiral binding सर्पिल बांधणी
binding copy, बांधणी प्रत
binding edge, बांधणी खाच
binding proof, योग्य बांधणीचा पुरावा
binding register, बांधणी नोंदवही
binding sequence, बांधणी क्रम
biographee, *n.* चरित्रनायक (पु.)
biographical dictionary, चरित्रकोश (पु.)
biography, *n.* चरित्र (न.)
bipartite, *adj.* द्विभागी
bipartite catalogue, द्विभागी तालिका
birchbark leaf, भूर्जपत्र (न.)
Biscoe time table, बिस्को समय तक्ता
bi-weekly, *n.* द्विसाप्ताहिक (न.) (आठवड्यातून दोनदा निघणारे)
black face = bold face
black letter type, (*also* Gothic antique or Gothic type) ठळक मुद्र, गोथिक मुद्र
blanking, *n.* धातु ठसा मुद्रण (न.)
blank leaf, कोरे पान
bleaching, *n.* विरंजन (न.)
bleed illustration, समासहीन लेखचित्र
bleeding, *n.* अपकृंतन (न.)
bleeding page, अपकृंतित पृष्ठ
blind reference, प्रतिनोंदविरहित निर्देश
blind stamping, १ शाईविरहित मुद्रांकन २ शाईविरहित ठसा
block, *n.* गट (पु.)
block accession, गटवार दाखलनोंद
block arrangement, (*also* block plan) गटवार रचना
block book, (*also* xylographic book) ठोकळ-मुद्रित ग्रंथ
block formation, गट रचना
block letters, (*also* capital letters *or* capitals) कॅपिटल अक्षरे (न.अ.व.) (कॅपिटल रोमन लिपीतील अक्षरे)
block library committee, गट ग्रंथालय समिति
block plan = block arrangement
block printing, (*also* relief process of illustrations) ठसे मुद्रण
block system, शालेय वर्ग देवघेव पद्धति, गटवार देवघेव पद्धति
blotting-paper, *n.* टिपकागद (पु.)
blue-book, *n.* शासकीय अहवाल (पु.), शासन अहवाल (पु.)
blurb, *n.* मलपृष्ठांतर्गत परिचय (पु.)
BNB, (*short for* British National Bibliography) बीएनबी
board, *n.* मंडळ (न.)
board label = booklet
Board of Directors, संचालक मंडळ
Board of Library Trustees, ग्रंथालय विश्वस्त मंडळ
bock, *n.* बॉक (पु.) (चामडीचा प्रकार)

bodkin stitching = stabbing
body matter, विषय वस्तु (स्त्री.)
body of the book, ग्रंथ मुख्यांग
body of the entry, नोंद मुख्यांग
bold face, (*also* black face) ठळक मुद्राक्षर
bold types, ठळक मुद्राक्षरे (न.अ.व.)
bond paper, बाँड पेपर
book, *n.* १ पुस्तक (न.) २ ग्रंथ (पु.)
abnormal book असाधारण ग्रंथ
associated book १ सहयोगी ग्रंथ २ सहयोगी पुस्तक
bibelot = miniature book = vade-mecum छोटेखानी पुस्तक, गुटका
miniature book = bibelot
oriental book प्राच्यविद्या ग्रंथ
simple book साधे पुस्तक
source book मूळसाधन ग्रंथ
standard book प्रमाण ग्रंथ
vade-mecum = bibelot
book acquisition, ग्रंथार्जन (न.)
book arrangement, १ पुस्तक मांडणी २ ग्रंथ मांडणी
book-band, *n.* ग्रंथ-बंध (पु.)
book-bank, *n.* ग्रंथपेढी (स्त्री.)
book-bin, *n.* (*also* book stand) ग्रंथधानी (स्त्री.)
bookbinding, *n.* ग्रंथबांधणी (स्त्री.)
book box, ग्रंथ पेटी
book brace = book support
book card, ग्रंथपत्र (न.)
book carrier, (*also* book trolly *or* book truck) ग्रंथवाहिनी (स्त्री.)
book case, *n.* पुस्तकधान (न.)
book classification, ग्रंथ वर्गीकरण
book club, *n.* वाचक मंडळ (न.)
book cover, (*also* dust cover; book jacket; dust jacket; dust wrapper) मलपृष्ठ (न.)
book cradle = book holder
book-display, *n.* ग्रंथ संदर्शन (न.)
book-distributor, *n.* ग्रंथवितरक (पु.)
book-drive, *n.* ग्रंथप्राप्ति मोहीम (स्त्री.)
book elevator, ग्रंथ उद्वाहक
book-end paper, (bookbinding paper) कागदी अस्तर
book exhibition, ग्रंथ प्रदर्शन
book-fair, *n.* ग्रंथ जत्रा (स्त्री.)
book-form catalogue, ग्रंथरूप तालिका
book holder, (*also* book cradle; book rest; copy holder) ग्रंथधारक (पु.)
book-hunter, *n.* १ ग्रंथान्वेषी (पु.) २ ग्रंथ-संग्राहक (पु.)
book index entry, ग्रंथनिर्देशी नोंद
book-jacket = book cover
book-label, *n.* ग्रंथचिठ्ठी (स्त्री.)
booklet, *n.* (*also* board label) पुस्तिका (स्त्री.) *cf.* handbook
book lift, ग्रंथ उद्वाहन
book-list, *n.* ग्रंथयादी (स्त्री.)
book-mark, *n.* ग्रंथखूणपत्र (न.)
book mobile = mobile library
book number, ग्रंथांक (पु.)
book on approval, पसंतीसाठी ग्रंथ
book on loan, उसनवार पुस्तक
book piracy, साहित्य चौर्य
book-plate, *n.* ग्रंथालयमुद्रा (स्त्री.)
book-pocket, *n.* (*also* card pocket) ग्रंथपत्र पाकीट (न.)
book-post, *n.* खुली डाक (स्त्री.), पुस्तक डाक (स्त्री.)
book process card, ग्रंथ उपस्कार पत्र, ग्रंथ प्रक्रिया पत्र
book purchasing section, ग्रंथ खरेदी विभाग
book-rack, *n.* ग्रंथ शिडाळे (न.)
book rarities, अप्राप्य ग्रंथ (पु.अ.व.)
book repair department, ग्रंथ दुरुस्ती विभाग
book rest = book holder

book review, ग्रंथ समीक्षा
book selection, ग्रंथ निवड
book seller's catalogue, ग्रंथविक्रेत्याची सूची
book service, ग्रंथालय सेवा
book shelf, ग्रंथ कपाट
book-shrine, *n.* ग्रंथायतन (न.)
book stand = book-bin
book-stock, *n.* ग्रंथसंग्रह (पु.)
book support, (*also* book brace) ग्रंथ टेकणी
book talk, ग्रंथपरिचय भाषण
book-trade, *n.* ग्रंथ व्यापार (पु.)
book tray, ग्रंथ धारिणी
book trolly = book carrier
book-trough, *n.* द्रोणाकार ग्रंथधारिणी (स्त्री.)
book truck = book carrier
book week, ग्रंथ सप्ताह
book with translation, सानुवाद ग्रंथ
bookworm, *n.* पुस्तकी किडा (पु.)
borrower, *n.* ग्रंथऋणग्राही (ग्रंथ उसनवारीने घरी घेऊन जाणारा वाचक) (पु.), वाचक सभासद (सा.)
borrower file = application file
borrower's card, ग्रंथऋणग्राहक पत्र, सभासद पत्र
borrower's card number, (*also* card number) १ सभासद पत्र क्रमांक २ सभासद पत्र संख्या
borrower's index, ग्रंथऋणग्राहक सूची
borrower's number, ग्रंथऋणग्राहक क्रमांक
borrower's record, नावे पुस्तक नोंद
borrower's register, वाचक सभासद नोंदवही
borrower's ticket, वाचक सभासद तिकीट
bottom note, तळटीप (स्त्री.)
bound, *adj.* बांधणी केलेले, बांधीव
bracket, *n.* (चौकोनी) कंस (पु.)
bracket shelf, कोनबैठकी मांडणी
Braille, *n.* ब्रेल लिपि (स्त्री.)
branch library, शाखा ग्रंथालय
brick-book, *n.* (*also* clay tablet) इष्टिका (स्त्री.)
British National Bibliography, (*abbr.* BNB) ब्रिटिश नॅशनल बिब्लिओग्राफी
brittle paper, ठिसूळ कागद
broad classification, स्थूल वर्गीकरण
broadsheet = broad side, *n. Print.* बृहत्पत्रक (न.), मोठा ताव (पु.)
brochure, *n.* लघुपुस्तक (न.) *cf.* handbook
broken file, (*also* incomplete file) खंडित फाईल
broken order, खंडित क्रम
Browne's book-charging system, ब्राउनेची देवघेव पद्धति
Brown's classification, ब्राउन वर्गीकरण
browsing, *n.* स्फुटवाचन (न.)
browsing room, स्फुटवाचन कक्ष
Brussels' expansion scheme = universal decimal classification
buckram, *n.* बकरम (न.)
budget, *n.* अर्थसंकल्प (पु.)
budget allotment, अर्थसंकल्पीय नियतवाटप
budget committee, अर्थसंकल्प समिति
budget estimates, अर्थसंकल्पीय अंदाज (पु. अ.व.)
budget provision, अर्थसंकल्पीय तरतूद
bulletin, *n.* पत्रिका (स्त्री.), बुलेटिन (न.)
business characteristic, व्यवसाय लक्षण
business library, व्यवसाय ग्रंथालय

# C

cabinet, *n.* (*also* card cabinet) खण कपाट (न.)
cabinet edition = library edition
calculating machine, (*also* calculator) १ परिगणक (पु.) २ परिगणित्र (न.)
calendar, *n.* दर्शिका (स्त्री.), कॅलेंडर (न.)
calender, *n.* झिलईयंत्र (न.)
calendered paper, झिलईदार कागद
calendering, *n.* झिलईकाम (न.)
call card, मागणीपत्र (न.)
calligraphy, *n.* अक्षररेखनकला (स्त्री.)
call number, बोधांक (पु.), मागणी अंक (पु.)
call number entry, मागणी अंक नोंद
call of the hour, (*also* efflux of time) १ कालप्रवाह (पु.) २ काळाची गरज
call slip, मागणी चिठ्ठी
call station, मागणी केंद्र
campus library, परिसर ग्रंथालय
cancel, *n.* दुरुस्त भाग (पु.)
cancelled leaf, रद्द पान
canon, *n.* सूत्र (न.)
canonical, *adj.* सूत्रविहित
canonical class, सूत्रविहित वर्ग
canonical division, सूत्रविहित विभाग
canonical order, सूत्रविहित क्रम
canonical sequence, सूत्रविहित अनुक्रम
canon of ascertainability, निश्चितिक्षमता सूत्र
canon of consistency, सुसंगति सूत्र
canon of context, पूर्वापर संदर्भ सूत्र
canon of currency, प्रचलितता सूत्र
canon of individualisation, व्यवच्छेदन सूत्र
canon of mnemonics, स्मृतिसाधक सूत्र
canon of permanence, स्थायित्व सूत्र
canon of prepotence, अधिक्षमता सूत्र
canon of recall value, पुनर्मागणी मूल्य सूत्र
canon of relevance, संबद्धता सूत्र
canon of reticence, मतनिरपेक्षता सूत्र
canon of sought heading, इष्ट शीर्षक सूत्र
capitalisation, *n.* कॅपिटल अक्षरात लिहिणे (न.)
capital letters = capitals = block letters
caption, *n.* मथळा (पु.)
card *n.* १ पत्र (न.) २ कार्ड (न.)
card cabinet = cabinet
card charging, पत्ररूप देवघेव
card form of catalogue, पत्ररूप तालिका
card frame, पत्र चौकट
cardinal number, संख्यावाचक अंक
card index, पत्ररूप निर्देशसूची
card number = borrower's card number
card pocket = book pocket
card repertory, (*also* joint catalogue *or* union catalogue) १ संयुक्त सूची २ संयुक्त तालिका
carpet area, चटई क्षेत्र, फरसबंद क्षेत्र
carrel, *n.* (*also* carrell) (*also* called alcove *or* research cubicle) संशोधन कक्ष (पु.)
cartographer, *n.* नकाशाकार (पु.)
cartography, *n.* नकाशाविद्या (स्त्री.)
cartridge, *n.* वायुचलित पेटिका (स्त्री.)
case binding, (*also* casang *or* case work) आवरणी बांधणी
casting of type, मुद्र ओताई, अक्षर ओताई
catalogue, *n.* १ तालिका (स्त्री.), कॅटलॉग (पु.) २ (as, a list) सूची (स्त्री.)
alphabetical catalogue वर्णक्रमी तालिका
alphabetico-classed catalogue वर्णक्रमी वर्गतालिका
alphabetic subject catalogue वर्णक्रमी विषय-तालिका
asyndetic catalogue प्रतिसंदर्भविरहित तालिका
auction catalogue लिलाव सूची
author catalogue ग्रंथकार तालिका

bipartite catalogue द्विभागी तालिका
book-form catalogue ग्रंथरूप तालिका
card form of catalogue पत्ररूप तालिका
card repertory = union catalogue
central catalogue मध्यवर्ती तालिका
classified catalogue वर्गीकृत तालिका
consolidated trade catalogue संयुक्त व्यापारी तालिका
departmental catalogue विभागीय तालिका
depository catalogue ठेवप्रत तालिका
dictionary catalogue कोश तालिका
guard book catalogue ग्रंथरूप चिठ्ठी तालिका
joint catalogue = union catalogue
ledger catalogue वही तालिका
library catalogue ग्रंथालय तालिका
manuscript catalogue हस्तलिखित तालिका
master catalogue सर्वांगीण तालिका
name catalogue नाम तालिका
national catalogue राष्ट्रीय तालिका
placard catalogue फलक तालिका
printed catalogue मुद्रित तालिका
printer's catalogue मुद्र तालिका
publisher's catalogue (प्रकाशकाची) प्रकाशन सूची
rotated catalogue विवरणात्मक विषय तालिका
sheaf form of catalogue चिठ्ठीरूप तालिका
subject catalogue विषय तालिका
syndetic catalogue संबंधक तालिका
trade catalogue व्यापार सूची
union catalogue = card repertory १ संयुक्त सूची २ संयुक्त तालिका
union trade catalogue संयुक्त व्यापारी तालिका
unipartite catalogue एकभागी तालिका

catalogue card, तालिका पत्र
catalogue card cabinet, तालिका पत्र कपाट
catalogue code, तालिका संहिता
cataloguer, *n.* तालिकाकार (पु.)
catalogue raisonne, वर्गीकृत तालिका
cataloguer's slip, (*also* catalogue slip; guide slip; process slip *or* work slip) प्रक्रिया चिठ्ठी, उपस्कार चिठ्ठी
catalogues catalogorum, कॅटलॉगस कॅटलॉगोरम
catalogue slip = cataloguer's slip
cataloguing, *n.* तालिकीकरण (न.)
cataloguing in publication, (*also* cataloguing in source *or* pre-natal cataloguing) प्रसिद्धिपूर्व तालिकीकरण
catch letters, सूचक अक्षरे (न.अ.व.)
catchword, *n.* सूचक शब्द (पु.)
catechism, *n.* प्रश्नोत्तरी (स्त्री.)
categorical tables, प्रवर्ग तक्ते (पु.अ.व.)
category, *n.* प्रवर्ग (पु.)
favoured category प्राधान्य प्रवर्ग
fundamental category मूलभूत प्रवर्ग

caution money = deposit
CD system (*classification decimale universelle*) = universal decimal classification
cellulose, *n.* सेल्यूलोज (न.)
cellulose acetate, सेल्यूलोज ॲसिटेट
cellulose nitrate, सेल्यूलोज नायट्रेट
centennial, *adj.* शतसांवत्सरिक
central catalogue, मध्यवर्ती तालिका
centralised cataloguing, केंद्रीकृत तालिकीकरण
central library, (*also* main library) केंद्रीय ग्रंथालय
central library authority, केंद्रीय ग्रंथालय प्राधिकरण
cess, *n.* उपकर (पु.)
chain, *n.* साखळी (स्त्री.)
chained book, शृंखलाबद्ध ग्रंथ
chain mark, (*also* chain line) साखळीचिन्ह, शृंखला चिन्ह
chain procedure, साखळी कार्यपद्धति

